**(वितरण आदेश क्रमांक-४)**

सन २०१९-२०२० या वर्षामधील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत National Rural Economic Transformation Project (NRETP) **योजनेकरीता** अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१९/प्र.क्र. ६३/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०४ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/ योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.
२. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०१९-आरएल(NRETP__१), दिनांक २९ ऑगस्ट, २०१९.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.३४०९, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी National Rural Economic Transformation Project (NRETP) योजनेंतर्गत रु.१८२८.८० लाख इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. त्यामुळे सदर केंद्र हिस्सा रु.१८२८.८० लाख व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.१२१९.२० लाख असा एकूण रु.३०४८.०० लाख इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) सर्वसाधारण प्रवर्ग (GENERAL) National Rural Economic Transformation Project (NRETP) केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.१८२८.८० लाख (रुपये अठरा कोटी अठ्ठावीस लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) सर्वसाधारण प्रवर्ग (GENERAL) National Rural Economic Transformation Project (NRETP) केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २७७५) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.१२१९.२० लाख (रुपये बारा कोटी एकोणीस लाख वीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

४. सदर रक्कम रु.१८२८.८० लाखाचा खर्च "मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार, (१) (१३) महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजीविका अभियान याअंतर्गत अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर लाभार्थ्यांना वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण) (६०%)(कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २९०८)" या लेखाशिर्षाखाली व रु.१२१९.२० लाखाचा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार , (०१) (०५) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या अनुसूचित जाती / जमाती व्यतिरिक्त लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य, (२५०१ २७७५)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

५. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक ८ जुलै, २०१९ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.३५२/अर्थोपाय, दिनांक ०३.१०.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१४४९४८३९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, serialNumber=6721aca60d5973c4d26547269488f4f9d7c98360213c1a8ca7eccc36b35448ff, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.11.04 15:21:18 +05'30'

**( दि. बा. पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवडनस्ती.